**परभणी येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२०/प्र.क्र.१९/२०/शिक्षण-१

९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक: २८.०३. २०२२.

**प्रस्तावना :**

जागतिक आरोग्य संघटनेच्या मानकांप्रमाणे १००० लोकसंख्येसाठी १ डॉक्टर असणे आवश्यक आहे. महाराष्ट्र राज्य हे भारतातील प्रगत राज्य असून शैक्षणिक क्षेत्रात विशेषत: वैद्यकीय शिक्षणाच्या क्षेत्रात अग्रगण्य राज्य मानले जाते. तथापि महाराष्ट्राची आर्थिक पाहणी सन २०२०-२०२१ नुसार महाराष्ट्र राज्यात प्रति १००० लोकसंख्येमागे डॉक्टरांचे प्रमाण ०.८४ इतके आहे. देश पातळीवरील सरासरीच्या (०.९०) दृष्टीने सदर प्रमाण कमी असुन जागतिक आरोग्य संघटनेच्या मानकांप्रमाणे कमी आहे. राज्यात सध्या डॉक्टरांची कमतरता असल्यामुळे वैद्यकीय शिक्षण विभागातील व सार्वजनिक आरोग्य विभागातील डॉक्टरांची बहुतांश पदे रिक्त आहेत. त्यामुळे राज्याच्या निमशहरी, ग्रामीण, दुर्गम व अतिदुर्गम भागातील जनतेस आरोग्यविषयक प्राथमिक सुविधा उपलब्ध करुन देण्यात अडचणी निर्माण होतात. राज्याच्या लोकसंख्येत झालेली वाढ आणि वैद्यकीय शिक्षणाबाबत तसेच आरोग्य सुविधेबाबत निर्माण झालेली जागरुकता लक्षात घेता नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय सुरु करणे गरजेचे आहे.

परभणी जिल्ह्याचा बराचसा भाग ग्रामीण असल्यामुळे येथील जनतेस दर्जेदार व परवडण्याजोग्या वैद्यकीय सुविधांचा अभाव जाणवत आहे. सद्य:स्थितीत परभणी जिल्ह्यामध्ये सार्वजनिक आरोग्य सेवेची रूग्णालये आहेत. परंतू, या मर्यादित वैद्यकीय सेवेद्वारे संपूर्ण जिल्ह्यास आरोग्य व्यवस्था पुरविण्यास अडचण निर्माण होत आहे. त्यानुषंगाने वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखाली परभणी येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमेतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रूग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

त्यानुषंगाने सदर प्रस्ताव मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यास दिनांक ०२.०३.२०२२ रोजीच्या मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

परभणी येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय केंद्र शासनाच्या मान्यतेनंतर सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तावित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयासाठी शासन निर्णयासोबत जोडलेल्या अनुक्रमे विवरणपत्र “ब व क” मध्ये दर्शविल्याप्रमाणे आवश्यक तेवढी पदनिर्मिती करण्यास आणि पदे

भरण्यास मान्यता देण्यात येत आहे. यासाठी उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेची अट शिथील करण्यात येत आहे.

३. नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित रुग्णालयाकरिता राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगाच्या मानकांप्रमाणे परभणी येथील सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील जिल्हा सामान्य रुग्णालय, अस्थिव्यंग रुग्णालय व स्त्री रुग्णालय निकषानुसार आवश्यक जागेसह (स्थावर जंगम मालमत्तेसह) तात्पुरत्या स्वरूपात वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास निःशुल्क वापरास उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. परभणी येथील नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित रुग्णालयाकरिता मौजे ब्रम्हपूरी, ता. जि. परभणी येथील उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने त्यांच्या नावे असलेली गट क्र. २, २०, ४७, ५३ येथील एकूण ५२.०६ हे. आर. ही आवश्यक जमीन महसूल विभागास निःशुल्क हस्तांतरीत करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर जमीन महसूल विभागामार्फत वैद्यकीय शिक्षण विभागास नि: शुल्क हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर जागेत नविन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालय स्थलांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. प्रस्तावित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयांसाठी आवश्यक तसेच अतिरिक्त बांधकाम करण्यास व त्यासाठी आवश्यक खर्चास शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र “अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

६. प्रस्तावित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांसाठी एकूण अंदाजित रू.६८२.७६ कोटी (अनावर्ती खर्च सुमारे रु.४२९.६३ कोटी व पहिल्या चार वर्षाकरिता आवर्ती खर्च सुमारे रूपये २५३.१३ कोटी) इतका खर्च अपेक्षित असून शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र “ड” मध्ये दर्शविल्याप्रमाणे आवश्यक निधी उपलब्ध करुन त्याप्रमाणे खर्चास मान्यता देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे आवश्यकता भासल्यास वेळोवेळी पुरक मागणीद्वारे निधी उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच, चौथ्या वर्षाप्रमाणे आवश्यक आवर्ती खर्चासाठी प्रति वर्षी सुमारे रूपये ७९.४१ कोटी इतका निधी उपलब्ध करून त्याप्रमाणे खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

७. या महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयांकरिता आवश्यक असणारी स्वच्छता, आहार, सुरक्षा, वस्त्र स्वच्छता ही सर्व कामे बाह्यस्त्रोतामार्फत राबविण्यास परवानगी देण्यात येत आहे. सदरची कामे जाहीर निविदा प्रक्रियेमार्फत ठेकेदारांची नियुक्ती करुन शासनाच्या पूर्व मान्यतेने करुन घेण्यात यावीत.

८. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक:-२५/१४७५, दिनांक २९.०१.२०२१ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-४३४/२०२१/व्यय-१३, दिनांक ०३.०९.२०२१ रोजीच्या अभिप्रायानुसार आणि मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ०२.०३.२०२२ रोजीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२८११३२४४९२१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL

Digitally signed by SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d32b061d22e577cf43207f6a86cadc4ce1798644845edd3b3fb5ef54c3051c62, pseudonym=FBB5CB78D48FD59FDB880E6E036B604B5888852F, serialNumber=30EC04F686F0E87515C68A42BC5DF9353C8AF939EF1A35539184495DA3E943C6, cn=SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL
Date: 2022.03.28 16:51:58 +05'30'

**(डॉ.श्री.पुं.कोतवाल)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
८. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा.राज्यमंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, निर्माण भवन, नवी दिल्ली.
११. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१२. अ.मु.स./प्र.स./सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, मुंबई.
१४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१५. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
१६. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१७. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक (पाच प्रती)
१८. जिल्हाधिकारी, परभणी.
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ / २ महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
२१. जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, परभणी.
२२. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये.
२३. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवडनस्ती (शिक्षण-१).

शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२०/प्र.क्र.१९/२०/शिक्षण-१, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

दिनांक -२८.०३. २०२२ चे सहपत्र

विवरणपत्र "अ"

महाविद्यालय व रूग्णालयाकरिता आवश्यक बांधकामावरील चार वर्षाचा अंदाजित खर्च

(रुपये कोटी)

| अ. क्र. | इमारतीचे स्वरुप | आवश्यक बांधकाम चौ.मी | खर्च प्रति चौरस मिटर | बांधकाम खर्च (प्रति महाविद्यालय) |
|---|---|---|---|---|
| १. | प्रशासकीय इमारत (महाविद्यालय) | ६४५० | ३१, ९००.०० (बांधकाम खर्च+ ६० टक्के अनुषंगीक खर्च मिळून एकूण बांधकाम खर्च) ५१४००.०० | ३३.१५ |
| २. | अचिकित्सालयीन व चिकित्सालयीन विभाग | ३०३६ | ५१४००.०० | १५.६० |
| ३. | रुग्णालयीन इमारत | २१३२३ | ५१४००.०० | १०९.६० |
| ४. | अधिकारी/कर्मचारी आवास आणि विद्यार्थी वसतिगृह | २१५७५ | ५१४००.०० | ११०.८९ |
| ५. | आवश्यकतेनुसार अतिरिक्त बांधकाम (१५ टक्के) | ७८५८ | ५१४००.०० | ४०.३९ |
| **एकूण** | | **६०,२४२ चौ.मी.** | | **३०९.६३** |

## विवरणपत्र "ब"

### महाविद्यालयाकरिता आवश्यक पदे व त्यावरील चार वर्षाचा अंदाजित खर्च

(रुपये कोटीत)

| अ. क्र. | संवर्ग | | महाविद्यालयाकरिता आवश्यक पदे व अंदाजित खर्च |
|---|---|---|---|
| १. | वर्ग-१ | पदे | ४८ |
| | | खर्च | ४४.३१ |
| २. | वर्ग-२ | पदे | ४४ |
| | | खर्च | १७.९० |
| ३. | विद्यावेतनाची पदे | पदे | ५९ |
| | | खर्च | १३.९९ |
| ४. | वर्ग-३ (नियमित पदे) | पदे | ९३ |
| | | खर्च | १४.६३ |
| ५. | काल्पनिक पदे वर्ग-३ (बाह्यस्त्रोताने) | पदे | १३९ |
| | | खर्च | ४.८९ |
| ६. | वर्ग-४ (कंत्राटी) | पदे | ६५ |
| | | खर्च | १.८८ |
| | **एकूण** | **पदे** | **४४८** |
| | | **खर्च** | **९७.६०** |

## विवरणपत्र "क"

## रूग्णालयाकरिता आवश्यक पदे व त्यावरील चार वर्षाचा अंदाजित खर्च

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | संवर्ग | | आवश्यक पदे व अंदाजित खर्च |
|---|---|---|---|
| १. | वर्ग-१ | पदे | ३ |
| | | खर्च | १.२४ |
| २. | वर्ग-२ | पदे | १७ |
| | | खर्च | ४.७३ |
| ३. | वर्ग-३ (नियमित पदे) | पदे | ५४४ |
| | | खर्च | ८७.६३ |
| ४. | काल्पनिक पदे वर्ग-३ (बाह्यस्त्रोताने) | पदे | ४५ |
| | | खर्च | १.६७ |
| ५. | वर्ग-४ (कंत्राटी) | पदे | ४७७ |
| | | खर्च | १३.९२ |
| | **एकूण** | **पदे** | **१०८६** |
| | | **खर्च** | **१०९.१९** |

## विवरणपत्र "ड"

## महाविद्यालय व रुग्णालय स्थापनेचा चार वर्षाचा एकूण खर्च

(रुपये कोटी)

| अ. क्र. | खर्चाचा तपशिल | प्रथम वर्ष | द्वितीय वर्ष | तृतीय वर्ष | चतुर्थ वर्ष | महाविद्यालय व रुग्णालयाचा खर्च (अंदाजित) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | इमारत व बांधकाम | १००.२० | ८८.१० | ८८.०२ | ३३.३१ | **३०९.६३** |
| २. | यंत्र सामुग्री उपकरणे | २६.०० | २८.०० | ३५.०० | ३१.०० | **१२०.००** |
| **एकूण अनावर्ती खर्च** | | **१२६.२०** | **११६.१०** | **१२३.०२** | **६४.३१** | **४२९.६३** |
| ३. | महाविद्यालयीन अधिकारी व कर्मचारी | १५.२५ | २४.५६ | २७.९६ | २९.८३ | **९७.६०** |
| ४. | रुग्णालयीन अधिकारी व कर्मचारी | १४.२३ | २५.९३ | ३२.२७ | ३६.७६ | **१०९.१९** |
| ५. | आवर्ती खर्च (दैनंदिन) | ५.८७ | ७.५१ | ८.६२ | ९.०३ | **३१.०३** |
| ६. | बाह्यस्त्रोत खर्च | ३.८६ | ३.८५ | ३.८१ | ३.७९ | **१५.३१** |
| **एकूण आवर्ती खर्च (चार वर्षासाठी)** | | **३९.२१** | **६१.८५** | **७२.६६** | **७९.४१** | **२५३.१३** |
| **एकूण आवर्ती+अनावर्ती खर्च** | | **१६५.४१** | **१७७.९५** | **१९५.६८** | **१४३.७२** | **६८२.७६** |